**राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून**
**लेखाशीर्ष २२०२ ११९८ या योजनेसाठी**
**पुनर्विनियोजनाद्वारे प्राप्त निधी वितरणास**
**प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- पुनर्वि-२०१७ /प्र.क्र.२३/ एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २९ मार्च, २०१७

वाचा :-

१) शिक्षण संचालक यांचे पत्र क्र.शिष्य/१७/पुनर्विनियोजन/२२१/६३५, दिनांक १८/०२/२०१७.
२) वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थस-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०८/०२/२०१७.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.पुनर्वि-२८१६/(७०/१६)/अर्थसंकल्प, दिनांक २७/०३/२०१७.

**प्रस्तावनाः-**

राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून, लेखाशीर्ष २२०२ ११९८ या योजनेसाठी सन २०१६-१७ साठी रु. १,९७,०००/- (एक लाख सत्त्याण्णव हजार फक्त) एवढी तरतूद अर्थसंकल्पीत केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ च्या दिनांक ८/०२/२०१७ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत निधीच्या ९०% निधी खर्चास उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार रु.१,९७,००० /- च्या ९०% म्हणजे रु. १,७७,०००/- (एक लाख सत्त्याहत्तर हजार फक्त) एवढा निधी खर्चास उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सन २०१६-१७ साठी राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून यांच्याकडून एकूण रु. २,४७,०००/-एवढ्या रकमेची मागणी करण्यात आली आहे. खर्चास उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी वजा जाता रु.७०,०००/- एवढी अतिरिक्त तरतूद आवश्यक आहे. विद्यार्थी शिष्यवृत्तीच्या लाभापासून वंचित राहू नयेत म्हणून माजी सैनिकांच्या मुलांना शैक्षणिक सवलत या योजनेतील "मागणी क्र. ई.-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण,८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (१२) माजी सैनिकांच्या मुलांना शैक्षणिक सवलत (अर्थोपाय अग्रिमाशी समायोजन) (२२०२ १५०९), दत्तमत ३४, शिष्यवृत्त्या/विद्यावेतन" या लेखाशीर्षाखाली रु. ३२९०००/- एवढया रकमेच्या बचतीमधून पुनर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय इंडियन मिलिटरी कॉलेज डेहराडून, या योजनेसाठी "मागणी क्र. ई.-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ,८०, सर्वसाधारण १०७, शिष्यवृत्त्या (००) (००) (०१) सैनिकी शाळा व महाविद्यालये (२२०२ ११९८), दत्तमत ३४, शिष्यवृत्त्या/विद्यावेतन " या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प कार्यासनाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाद्वारे रु.७०,०००/-( रु.सत्तर हजार फक्त ) एवढी अतिरिक्त तरतूद उपलब्ध करण्यात आली आहे. सदर रक्कम बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे. तसेच सदर निधी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत केलेला आहे.

२. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त ( शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणाऱ्या निधीकरिता आहरण व संवितरण अधिकारी यांना घोषित करण्यात येत आहे.

३. " मागणी क्र. ई.-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ,८०, सर्वसाधारण १०७, शिष्यवृत्त्या (००) (००) (०१) सैनिकी शाळा व महाविद्यालये (२२०२ ११९८) , दत्तमत ३४, शिष्यवृत्त्या/विद्यावेतन " या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून खर्च करण्यात यावा.

४. सन २०१५-१६ या वर्षाकरिता देय असलेली शिष्यवृत्तीची थकीत रक्कम विद्यार्थ्यांना अदा करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९८/व्यय-५ दि.१५/०३/२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१५१२०९८४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Neha Nandkumar Humraskar

Digitally signed by Neha Nandkumar Humraskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fad9131f2c2ae9d6d9bb053715c4b9e08b15382beb01922a7bf2c233de3f7a45, cn=Neha Nandkumar Humraskar
Date: 2017.03.29 15:17:37 +05'30'

**( नेहा हुमरसकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक ), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. आयुक्त, शासकीय परीक्षा मंडळ, पुणे.
४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
५. सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद.
६. शिक्षण निरीक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम), बृहन्मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. वित्त विभाग (व्यय ५/अर्थोपाय/अर्थसंकल्प ६), मंत्रालय, मुंबई
१४. मेजर जनरल, जनरल ऑफिसर कमांडिंग, महाराष्ट्र एवं गुजराथ ॲरिया, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
१५. कमांडंट राष्ट्रीय मिलिटरी कॉलेज, डेहराडून कॅन्टॉनमेंट (उत्तराखंड)
१६.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
१७. निवड धारिका एसडी.-५.